GR-200408061311 2602-1201

योजनेचे अनुदान योजनेकडे
खर्च करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
परिपत्रक क्रमांक: विसप्र२००३/प्र.क्र.३०२४/वित्त २(२३)
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२ , दिनांक :- २३ मार्च, २००३

संदर्भ:- शासन परिपत्रक क्र. अआर२००१/प्र.क्र.२६३२/२३, दिनांक ३१ मार्च २००१

परिपत्रक :- सन २००१-२००२ या वित्तीय वर्षापासून आस्थापना खर्चाबाबत संबंधित प्रशासकीय विभाग/नियंत्रक अधिकारी यांचेकडून वितरणाचे आदेश निर्गमित केले जातात व आस्थापनेवर खर्च हा अर्थोपाय अग्रीमाशी संबंधित असल्यामुळे या विभागाकडून वित्त विभागाच्या सहमतीने वितरीत करण्यात येतात.

आपल्या मासिक अहवालावरून शासनाच्या असे निदर्शनास आले कि, काही योजनांवर जादा खर्च तर काही योजनांवर कमी प्रमाणात तर काही योजनांवर खर्च केला जात नाही, किंवा होत नाही असे दिसून आले ही बाब गंभीर आहे.

या परिपत्रकाव्दारे असे आदेश देण्यात येत आहेत की,

23

१) ज्या योजनेसाठी प्राप्त झालेले अनुदान त्याच योजनेखाली खर्च करणे जरुरी आहे.

२) अर्थोपाय अग्रीमामधून विशिष्ट योजनेसाठी उदा. ३०५४ अग्रीम वितरीत केल्यास ते त्याच योजनेवर खर्च करणे क्रमप्राप्त आहे.

३) अर्थोपय अग्रीमातून प्राधान्य देण्याबाबत विभागाने विशेष आदेश दिल्यास त्याला प्राधान्य देणे आवश्यक आहे.

४) सर्वसाधारणपणे अग्रीमाचा हप्ता हा सर्व योजनांना समप्रमाणात खर्चासाठी उपलब्ध झाला पाहिजे. परंतु जर काही प्राधान्याने खर्च करावे असे वाटत असेल तर त्याबाबतचा निर्णय काळजीपूर्वक पदाधिकारी व अधिकारी यांनी विचारविनिमय करुन घेतला पाहिजे व याबाबतची कारणमिमांसा सविस्तरपणे नमूद केली पाहिजे.

CR 3024.13.4.03/m7

५) तसेच यापूर्वी विभागाने सूचना दिलेल्या आहेत की, आस्थापना अनुदान व आस्थापनेवर अनुदान याची सरमिसळ करण्यात येऊ नये, या आदेशाचे पालन काटेकोरपणे करण्याची आवश्यकता आहे.

ज्या योजनेवर खर्च करणे आवश्यक आहे त्या योजनांना प्राधान्याने खर्च करण्यात यावा तसेच योजनेचे अनुदान हे योजनेवरच खर्च करणे आवश्यक आहे. इतरत्र वळविण्याचा प्रयत्न करु नये.

(जयश्री चौधरी)

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद सर्व,
मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद सर्व